आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शीर्षांतर्गत निधी वितरण (लेखाशीर्ष २२०२ १९०१, २२०२ १९४८)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.०४/का-६.**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक: ३० सप्टेंबर,२०२१.**

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.
२) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग, समक्रमांक,दि.८.०४.२०२१,दि.१२.०५.२०२१, दि.२.०६.२०२१ व दि.१६.०७.२०२१.
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.अनुवि-४९२१/ प्र.क्र.४३/भाग-१/अर्थसंकल्प.

**प्रस्तावना:-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शीर्षांतर्गत शालेय शिक्षण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या आदिवासी क्षेत्रांतर्गत १) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहाय्यक अनुदान-(२२०२ १९०१) व अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान (२२०२ १९४८) या योजनांतर्गत ३६-सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांकरीता ५० % मर्यादेतील निधी शालेय शिक्षण विभागास संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयांन्वये वितरीत करण्यात आलेला आहे.

आता शालेय शिक्षण विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरून वित्त विभागाने अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) या योजनांच्या ३६-सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पित तरतूदींच्या १०० टक्के मर्यादेतील उर्वरीत ५० % इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेला आहे. या अनुषंगाने सदर निधी शालेय शिक्षण विभागास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२१-२२ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२०२-सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत खालीलप्रमाणे १०० टक्के मर्यादेत उर्वरीत ५० टक्के प्रमाणे एकूण रू.२३७५.०० लाख (अक्षरी रूपये तेवीस कोटी पंच्याहत्तर लाख फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नांव | अर्थसंकल्पित तरतूद सन २०२१-२२ | यापुर्वी वितरीत ५० टक्के तरतूद | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (२२०२ १९०१),३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) | ४५००.०० | २२५०.०० | २२५०.०० |
| २ | अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान (२२०२ १९४८ ),३६-सहाय्यक अनुदाने (वेतन) | २५०.०० | १२५.०० | १२५.०० |
| | **एकुण** | **४७५०.००** | **२३७५.००** | **२३७५.००** |

२. उपरोक्त प्रमाणे एकूण **रू.२३७५.०० लाख (अक्षरी रुपये तेवीस कोटी पंचाहत्तर लाख)** इतका निधी अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना वितरीत करण्यात आला असून प्रकरणी विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.८३६/व्यय-१४, दि.१३.०९.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२८१५२३३६०२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2021.09.30 18:02:11 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.